**<u>महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील</u>**
**<u>अधिका-यांच्या बदल्या / नियुक्त्या.</u>**

# महाराष्ट्र शासन

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**

शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०११/प्र.क्र. २५९/आस्था-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०११.

**<u>आदेश</u>:-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने या विभागातील **श्री. टी. आर. गुरव, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, उस्मानाबाद** यांची नियुक्ती या आदेशान्वये **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. टी. आर. गुरव यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री. टी. आर. गुरव यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

४. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्याच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११०२११७३११८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

विभागीय आयुक्त, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
संबंधित अधिकारी, द्वारा - संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.